सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने.
संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर या प्रशिक्षण संस्थेस अनुदान वितरीत करण्याबाबत.
मुख्य लेखाशिर्ष-२५१५ ००२६ ( सहावा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२१ /प्र.क्र.४३/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : ०८ फेब्रुवारी, २०२२.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन परिपत्रक क्रमांक- ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.०९.१९९८.
३) शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२१ /प्र.क्र.४३/आस्था-१५, दि. ०७.०४.२०२१.
५) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२१ /प्र.क्र.४३/आस्था-१५, दि.११.०५.२०२१
६) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२१ /प्र.क्र.४३/आस्था-१५ दि.२५.०६.२०२१
७) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२१ /प्र.क्र.४३/आस्था-१५, दि.२३.०८.२०२१
८) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२१ /प्र.क्र.४३/आस्था-१५, दि.२५.११.२०२१

**शासन निर्णय-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, ००३- प्रशिक्षण, ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०२) श्री मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना (संकेतांक क्र.२५१५ ००२६), (योजनेत्तर) (दत्तमत) ( मागणी क्र. एल -३ ) अंतर्गत संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर यांना वेतनेतरसाठी रु. ९.४१ लक्ष (रुपये नऊ लक्ष एक्केचाळीस हजार ) व वेतनासाठी रु. ८८.७३ लक्ष (रुपये अठयाऐंशी लक्ष त्र्याहात्तर हजार ) असे एकूण रु. ९८.१४ लक्ष ( रुपये अठ्ठयाण्णव लक्ष चौदा हजार फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

२. सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता ३६ सहायक अनुदान (वेतन ) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १० % मर्यादेत वेतनासाठी रु.८.८७३ लक्ष (रुपये आठ लक्ष सत्याऐंशी हजार

तीनशे फक्त) इतके अनुदान संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये , अर्थसंकल्पीय अंदाजाच्या ५ % मर्यादेत दुसरा हप्ता म्हणून वेतनासाठी रुपये ४.४३६५ लक्ष ( रुपये चार लक्ष त्रेचाळीस हजार सहाशे पन्नास फक्त) इतके अनुदान संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये, अर्थसंकल्पीय अंदाजाच्या १०% मर्यादेत रु.८.८७३ लक्ष (रु. आठ लक्ष सत्याऐंशी हजार तीनशे फक्त) इतके अनुदान संदर्भ क्र.६ अन्वये, अर्थसंकल्पिय अंदाजाच्या २५ % मर्यादेत रु. २२.१८२५ लक्ष ( रुपये बावीस लक्ष अठरा हजार दोनशे पन्नास फक्त) इतके अनुदान संदर्भ क्रमांक ७ अन्वये आणि अर्थसंकल्पिय अंदाजाच्या २५ % मर्यादेत रु. २२.१८२५ लक्ष ( रुपये बावीस लक्ष अठरा हजार दोनशे पन्नास फक्त) इतके अनुदान संदर्भ क्रमांक ८ अन्वये संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना वितरित करण्यात आले आहे.

३. आता वित्त विभागाने शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता विभागीय आयुक्त पुणे यांनी सादर केलेल्या तपशिलाप्रमाणे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता रु. ७०००/- ( रुपये सात हजार फक्त ) इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७०१/व्यय १५, दिनांक २३.१२.२०२१ अन्वये संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि. कोल्हापूर यांना ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता रु. ७०००/- (रुपये सात हजार फक्त) सहावा हप्ता म्हणून वितरित करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण -११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), पुणे विभाग, पुणे यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

५. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. हा खर्च मागणी क्र.एल-३,"२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम" ००३ प्रशिक्षण ०१(०२) श्री मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना (संकेतांक क्र.२५१५ ००२६) ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो यावर्षी त्या लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा . तसेच सदर खर्च त्याच उपलेखाशिर्षाखाली पडतो आहे याबाबतचा ताळमेळ घालून त्याचा दरमहा अहवाल विभागीय

आयुक्तांनी शासनास सादर करावा.सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना), हे काम पाहतील.

७. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

८. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

९. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १७/०४/२०१५ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून आणि वित्त विभाग शासन निर्णय शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ आणि वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७०१/व्यय १५, दिनांक २३.१२.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०२०८१७३३४००३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: cn=SUNIL SURYAKANT HANJE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2022.02.10 14:37:26 +05'30'

(सुनिल हंजे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (दोन प्रती)
२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (नोंदणीकृत डाकेने)

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
६. संचालक, श्री.मौनी विद्यापीठ गारगोटी, जि.कोल्हापूर
७. प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर (२ प्रतींसह)
८. वित्त विभाग (का.क्र.अर्थसंकल्प-१७/व्यय १५)
९. कार्यासन.क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास विभाग
१०. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५